**सन २०१९-२० करीता आदिम जमातीचा विकास या राज्य योजनेंतर्गत आदिम जमातीच्या कुटुंबाकरिता घरकुल बांधण्याच्या खर्चास मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः आदिम-२०१९/प्र.क्र.११/का.-१९**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
तारीख: १८ फेब्रुवारी, २०२०

वाचा -

१. आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक: आदिम-२०१७/प्र.क्र.१३/का-१९, दिनांक ०६/०२/२०१७
२. आदिवासी विकास विभाग ,शासन निर्णय क्रमांक: शघयो-२०१६/प्र.क्र.३३६/का-१७, दिनांक ०६/०१/२०१७

प्रस्तावना (Preamble) -

राज्यातील कातकरी, माडिया गोंड व कोलाम या जमाती आदिम जमाती (Particularly Vulnerable Tribes) म्हणून केंद्रशासनाने अधिसूचित केलेल्या आहेत. या जमाती अतिशय दुर्गम व डोंगराळ भागात वस्ती करुन राहतात. यामुळे या जमातींचा निवासाचा प्रश्न सोडविण्यास प्राधान्य देऊन सन २०१९-२० या वर्षाकरीता आदिम जमातीचा विकास या बाबीसाठी रू.२०००.०० लक्ष इतका निधी अर्थसंकल्पीत करण्यात आला आहे. त्यापैकी ६० टक्के निधी म्हणजेच रु. १२००.०० लक्ष निधी अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध करुन देण्यात आलेला आहे. आदिम जमातीचा विकास कार्यक्रमांतर्गत घेण्यात येणाऱ्या घरकुलांची योजना शबरी आदिवासी घरकुल योजनेच्या धर्तीवर राबविण्याबाबत संदर्भ क्र. १ वरील शासन निर्णयान्वये मंजूरी प्रदान करण्यात आलेली आहे. तसेच संदर्भ क्र. २ वरील शासन निर्णयान्वये घरकुलांच्या अनूदानाची निश्चिती करण्यात आलेली आहे. यानुसार सन २०१९-२० करीता उपलब्ध निधीतून घरकुल बांधण्याकरीता लक्षांक निश्चित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय (Government resolution)-

आदिम जमातीच्या विकासासाठी राज्य योजनेअंतर्गत आदिम जमातीचा विकास या योजनेंतर्गत सन २०१९-२० या वर्षात अर्थसंकल्पिय प्रणालीवर उपलब्ध रु. १२००.०० लक्ष तरतुदीमधुन शबरी घरकुल योजनेच्या धर्तीवर आदिम जमातीच्या कुटुंबासाठी ८४५ घरकुले बांधकाम करण्याच्या खर्चास मान्यता देण्यात येत आहे. सदर घरकुल बांधकाम करण्याची योजना ग्रामविकास विभागा अंतर्गत स्थापन करण्यात आलेल्या राज्य व्यवस्थापन कक्ष-ग्रामीण गृह निर्माण मार्फत राबविण्यात यावी. यासाठी पात्र लाभार्थ्यांची यादी ही संबधित प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प यांच्याकडून राज्य व्यवस्थापन कक्ष-ग्रामीण गृह निर्माण यांना उपलब्ध करुन देण्यात येईल. या योजनेखाली जिल्हानिहाय घरकुलांचे उद्दीष्ट व निधी वितरण खालील तालिकेत नमूद केल्याप्रमाणे राहील. याव्यतिरिक्त राज्यात घरकुलासाठी पात्र आदिम जमातींच्या लाभार्थ्यांना विभागामार्फ़त राबविण्यात येणा-या घरकुलाच्या अन्य योजनांमधुन देखील प्राध्यान्याने लाभ देण्यात यावा.

**आदिम जमाती घरकुलाकरीता सन २०१९-२० सालाकरीता लक्षांक**

| अ.क्र. | जिल्हा | लोकसंख्येच्या प्रमाणात आदिम घरकुलाचा जिल्ह्याकरीता लक्षांक | निधी ( रु. लक्षमध्ये ) |
|---|---|---|---|
| १ | नाशिक | १२ | १७.०४ |
| २ | ठाणे | ९४ | १३३.४८ |
| ३ | पुणे | १९ | २६.९८ |
| ४ | पालघर | १०१ | १४३.४२ |
| ५ | रायगड | १४७ | २०८.७४ |
| ६ | यवतमाळ | २५८ | ३६६.३६ |
| ७ | नांदेड | १४ | १९.८८ |
| ८ | गडचिरोली | २०० | २८४.०० |
| एकूण | | ८४५ | ११९९.९ |

**(टिप:- उपरोक्त प्रमाणे लक्षांकांमध्ये स्थानिक स्तरावर सपाट व डोंगरी भागाचे निकष लक्षात घेवून प्राप्त निधीच्या मर्यादेत लक्षांकामध्ये बदल करण्याचे अधिकार संबधित प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प यांना राहतील. एका जिल्ह्यामध्ये एकापेक्षा जास्त ए. आ.वि. प्रकल्प असल्यास त्यातील आदिम जमातीच्या लोकसंख्येनुसर लक्षांक विभागुन देण्यात यावा.)**

२. या योजनेखाली वितरीत करण्यात येणारा रु. १२००.०० लक्ष इतका निधी आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांचे मार्फत राज्य व्यवस्थापन कक्ष-ग्रामीण गृह निर्माण कडे तात्काळ वर्ग करण्यात यावा.

३. उपरोक्त रु. १२००.०० लक्षचा खर्च मागणी क्र. टी-५, मुख्य लेखाशीर्ष २२२५- अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती व इतर मागासवर्गीयांचे कल्याण - पंचवार्षिक योजनांतर्गत योजना - ०१ - अनुसूचित जमातीचे कल्याण - ७९६- जनजाती क्षेत्र उपयोजना (०१) जनजाती क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना - राज्य योजनांतर्गत योजना, (०१) (४९) आदिम जमातीचे विकासासाठी केंद्रीय क्षेत्र योजना, ३१ सहायक अनुदाने (२२२५ C८८५) (वेतनेतर) या लेखाशीर्षाखाली सन २०१९-२० मध्ये अर्थसंकल्पित झालेल्या तरतूदीतून करण्यात यावा.

४. सदरची तरतूद अर्थसंकल्पिय अंदाज वितरण व संनियंत्रण प्रणालीद्वारे वितरीत करण्यात आली आहे. सदर निधी आहरित करुन वितरित करण्यास आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. त्यांनी वितरीत निधीच्या मर्यादेत निधी आहरीत करण्याची दक्षता घ्यावी.

५. उपरोक्त मंजूर करण्यात आलेले अनुदान ते ज्या बाबींसाठी खर्च करण्यास मंजुरी देण्यात आलेली आहे, त्याच बाबींसाठी खर्च करावे व त्याचे एकत्रित उपयोगिता प्रमाणपत्र आर्थिक व भौतिक अहवालासह शासनास सादर करण्याची दक्षता आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक यांनी घ्यावी.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००२१८१३३८२२४१२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Waje Prakash Vijay

Digitally signed by Waje Prakash Vijay
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tribal Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=1b4b695a8c26d140fc5c049d281eedbf23beed9a89ad7526416132cf28f14776, serialNumber=400892e5e82479e4f3c8cf46538dc917b7071e979796d37178d3b709e19155ab, cn=Waje Prakash Vijay
Date: 2020.02.18 13:40:04 +05'30'

**( प्रकाश वि. वाजे )**

कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. मंत्री, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
२. मा. राज्यमंत्री, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
३. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
५. प्रधान सचिव, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. प्रधान सचिव, आदिवासी विकास यांचे वरीष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
७. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक
८. अपर आयुक्त, आदिवासी विकास ठाणे, नाशिक, अमरावती, नागपुर.
९. राज्य संचालक, राज्य व्यवस्थापन कक्ष- ग्रामिण गृह निर्माण, बांधकाम भवन, फोर्ट, मुंबई.
१०. प्रकल्पअधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प,गडचिरोली/ अहेरी/ भामरागड / पांढरकवडा/ पुसद/ कळवण/नाशिक/ शहापुर/ पेण/ घोडेगाव/ डहाणु/जव्हार /किनवट
११. नियोजन विभाग/वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. उप सचिव, आदिवासी विकास, मंत्रालय, मुंबई.
१३. कार्यासन अधिकारी, का-६/१७, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४. निवड नस्ती (का.१९) आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.